**पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या त्रिशताब्दी जयंतीनिमित्त अहिल्यादेवींनी उभारलेल्या घाट, विहिरी, पाणीवाटप या ऐतिहासिक जलसंपत्ती प्रणालींचा सर्वे करून त्यांच्या जतनासाठी विशेष योजना राबविण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-२०२५/प्र.क्र.२०४/जल-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक: ०५ जून, २०२५.**

वाचा: दि.०६.०५.२०२५ रोजीच्या मा. मंत्रीमंडळ बैठकीचे कार्यवृत्त दि. १३-०५-२०२५.

**प्रस्तावना-**

पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या त्रिशताब्दी जयंतीनिमित्त लोककल्याणकारी निर्णय घेण्याबाबत दि. ०६.०५.२०२५ रोजी मौजे चौंडी, ता. जामखेड अहिल्यानगर येथे मंत्री परिषदेची बैठक पार पडली. सदर बैठकीत ऐतिहासिक जलसंपत्तीचे जतन करणेच्या दृष्टीने पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांनी उभारलेले तलाव, घाट, कुंड व विहिरी/बारव यांची दुरूस्ती करणे, तलावातील गाळ काढणे, पुनरुज्जीवन व सुशोभीकरण करणे अशी कामे करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार प्राथमिक संकलनात विभागाकडून प्राप्त झालेल्या राज्यातील ३ तलाव, १९ बारव/विहीरी, ६ कुंड व ६ घाट असे एकुण ३४ जलाशयांचे मृद व जलसंधारण विभागामार्फत दुरूस्ती, तलावातील गाळ काढणे, पुनरुज्जीवन व सुशोभिकरण करणे इ. कामे हाती घेणे विचाराधीन होते.

त्यास अनुसरुन शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे-

**शासन निर्णय :**

पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या त्रिशताब्दी जयंतीनिमित्त राज्यातील अहिल्यादेवी होळकर यांनी उभारलेल्या तलाव, बारव/विहिरी, कुंड व घाट अशा ऐतिहासिक जलसंपत्तीचे जतन करणेच्या दृष्टीने प्राथमिक संकलनात विभागाकडून प्राप्त झालेल्या राज्यातील ३ तलाव, १९ बारव/विहीरी, ६ कुंड व ६ घाट असे एकुण ३४ जलाशय तसेच यानंतर सर्वेक्षणात आढळून येणारे अन्य ऐतिहासिक जलवास्तू यांची मृद व जलसंधारण विभागामार्फत दुरूस्ती, तलावातील गाळ काढणे, पुनरुज्जीवन व सुशोभिकरण करणे या कामांस रु. ७५ कोटी किंमतीच्या मर्यादेत खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे. प्राथमिक संकलनात आढळलेल्या ३४ योजनांची यादी "जोडपत्र अ" मध्ये दर्शविण्यात आली आहे.

१) "जोडपत्र अ" मधील ३४ योजनांशिवाय सर्वेक्षणामध्ये आढळून येणाऱ्या अन्य योजना देखील वित्तीय तरतूदीच्या मर्यादेत समाविष्ठ करण्यात येतील.

२) प्रस्तावित दुरूस्ती/पुनरुज्जीवनामुळे मुळ बांधकामाच्या सौंदर्यास बाधा पोहोचणार नाही याची दक्षता घ्यावी तसेच सदर दुरूस्ती/पुनरुज्जीवनाचे काम हाती घेताना संबंधित क्षेत्रातील तज्ञ व्यक्तींचा सल्ला घ्यावा.

३) प्रस्तावित करण्यात आलेल्या कामांची दुरुस्ती किंवा सुशोभिकरण करणेबाबतची कामे शासनाच्या इतर कोणत्याही विभागामार्फत केली जात नाही याबाबत क्षेत्रीय स्तरावरुन खातरजमा करण्यात यावी. कामांची व्दिरुक्ती झाल्यास जिल्हा जलसंधारण अधिकारी यांची जबाबदारी राहील.

४) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी कार्यस्थळी भेट देऊन, स्थळ पाहणी करुन कामांचा आराखडा निश्चित करावा व आराखड्यास शासनाची पूर्वमान्यता घेऊन प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव शासनास सादर करावे. ज्या ठिकाणी दुरूस्तीची आवश्यकता नाही किंवा अस्तित्वातील बांधकाम सुस्थितीत आहे तेथे दुरूस्तीची कामे प्रस्तावित करू नये.

५) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत करण्यात यावा व विहीत वेळेत काम पूर्ण करण्यात यावे.

६) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा पूर्णत्वाचा अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

७) कामांचे Geotag व वेळेसह व्हिडीओ चित्रीकरण करणे बंधनकारक राहील.

a) काम सुरू करण्यापूर्वी

b) २५% पूर्ण झाल्यानंतर.

c) ५०% काम पूर्ण झाल्यानंतर.

d) ७५% काम पूर्ण झाल्यानंतर.

e) १००% काम पूर्ण झाल्यानंतर.

या कामात पाच टप्प्यात Geotag व्हिडीओ चित्रीकरण करण्यात यावे. प्रत्येक टप्प्याच्या व्हिडिओ चित्रीकरणाचा कालावधी किमान ३ मिनिटाचा आवश्यक राहील. काम सुरू करण्यापूर्वी एका बाजूने चित्रीकरण सुरुवात करून दुसऱ्या टोकापर्यंत संपूर्ण चित्रीकरण करण्यात यावे.

अ) व्हिडीओ चित्रीकरण करताना प्रत्येक वेळेस कामाचे जलसंधारण अधिकारी व कंत्राटदार/ त्यांचा प्रशिक्षित तांत्रिक कर्मचारी यांची उपस्थिती अनिवार्य आहे.

ब) चित्रीकरणांमध्ये किमान दोन टप्प्यांमध्ये उपविभागीय जलसंधारण अधिकारी व एका टप्प्यामध्ये जिल्हा जलसंधारण अधिकारी यांची उपस्थिती अनिवार्य आहे.

क) देयके पारित करताना मोजमाप पुस्तिकेसोबत चित्रीकरणाचा Pendrive सादर करावा. तसे मोजमाप पुस्तिकेत नमूद करावे.

ड) सदर चित्रीकरणाची प्रत जिल्हा जलसंधारण अधिकारी यांनी तपासावी व वरील सूचनांप्रमाणे चित्रीकरण नसल्यास देयक पारित करू नये.

इ) चित्रीकरणाची किमान १५ सेकंदांची संक्षिप्त प्रत विभागाच्या पोर्टलवर Upload करण्यात यावी.

८) काम पूर्ण झाल्यानंतर कामाची गुणनियंत्रणाच्या दृष्टीने विभागाच्या दक्षता व गुणनियंत्रण पथकाकडून तपासणी करण्यात यावी.

९) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करण्यात येऊ नये.

१०) सदर कामाची अंमलबजावणी करतांना दर्जा व गुणवत्ता उत्कृष्ठ ठेवण्याची जबाबदारी संबंधीत क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहील.

११) शासन परिपत्रक क्र. प्रमा-२०१३/(७८५/१३)/ सिं.व्य. (कामे) दि. ०१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचना नुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

१२) आवश्यकतेनुसार अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने, बाह्य दरसूची बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

१३) सखोल सर्वेक्षणानंतर सदर कामांचे सविस्तर अंदाजपत्रके/प्राकलने प्रचलित मृद व जलसंधारण विभाग व सार्वजनिक बांधकाम विभागाची दरसुचीवर विचारात घेऊन तयार करण्यात यावे.

१४) प्रस्तावित पुनरुज्जीवनाची कामे हाती घेण्यापुर्वी योजनेची मालकी असलेल्या प्राधिकरणाची नाहरकत घेण्यात यावी.

२. या योजनेच्या कामावर होणारा खर्च विशेष बाब म्हणून खालील लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्षः-**

**मागणी क्र. झेड एच- ५**

**(०२) (०१) लहान पाटबंधारे योजना**

**४७०२ ए ०४६**

**० ते १०० हेक्टर सिंचन क्षमता**

**परिरक्षण व दुरुस्ती (कार्यक्रम)**

**५३, मोठी बांधकामे**

सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने अनुक्रमे नियोजन विभागाचा अनौ.सं.क्र. ११४-अ/२५/१४३४, दि. ०५.०५.२०२५ व अनौ.सं.क्र. ३२९/२०२५/व्यय-१५,

दि. ०५.०५.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच संदर्भिय पत्रान्वये दि. ०६.०५.२०२५ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीतील निर्णयाच्या अनुषंगाने सदर प्रस्तावास मान्यता देण्यात आलेली आहे.

प्रस्तुत आदेश प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शर्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०६०५११५९३१३३२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAKASH NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT,
2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2025.06.05 12:00:15 +05'30'

**(प्र. नि. पाटील)**
**कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन,मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव.
३) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई.
४) सर्व मा. संसद सदस्य, विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खासगी सचिव
६) मा. मंत्री, मृद व जलसंधारण यांचे खासगी सचिव
७) मा. राज्यमंत्री, मृद व जलसंधारण यांचे खासगी सचिव
८) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
९) सर्व मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव.
१०) सचिव ( मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) आयुक्त, मृद व जलसंधारण, जल आयुक्तालय, छ. संभाजीनगर.
१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छ. संभाजीनगर.
१४) अप्पर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे/ नागपुर.
१५) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, सर्व.
१६) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, सर्व.
१७) कार्यासन अधिकारी (जल-४), जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई.
१८) निवडनस्ती (जल-१).

**मृद व जलसंधारण विभाग**

**"जोडपत्र अ"**

**पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या त्रिशताब्दी जयंतीनिमित्त अहिल्यादेवींनी उभारलेल्या घाट, विहिरी, पाणीवाटप या ऐतिहासिक जलसंपत्ती प्रणालींचा सर्वे करून त्यांच्या जतनासाठी विशेष योजना राबविण्याबाबत..**

**शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-२०२५/प्र.क्र.२०४/जल-१, दि. ०५ जून, २०२५**

**प्राथमिक संकलनात आढळलेल्या योजना**

**अ. ऐतिहासिक तलाव**

१. चांदवड, ता. चांदवड जि. नाशिक येथील ऐतिहासिक तलाव
२. त्र्यंबकेश्वर, ता. त्र्यंबकेश्वर, जि. नाशिक येथील ऐतिहासिक तलाव
३. मल्हार गौतमेश्वर, जेजुरी, ता. पुरंदर जि. पुणे येथील ऐतिहासिक तलाव

**ब. बारव/विहिरी.**

१. वाफेगाव १, जि. सोलापूर
२. वाफेगाव २, जि. सोलापूर
३. करमाळा जि. सोलापूर.
४. माळशिरस जि. सोलापूर.
५. लिंबगाव, जि. सातारा.
६. गुरसाळे-रामलिंग, जि. सातारा.
७. तुळजापूर, जि. धाराशिव.
८. शिरपूर, जि. अहिल्यानगर.
९. साखरगाव, जि. नाशिक.
१०. घाटनदेवी, ता. इगतपुरी, जि. नाशिक.
११. कसवे ओझर, जि. नाशिक
१२. जामनेर पाळधी, जि. जळगाव.
१३. जेजुरी, जि. पुणे.
१४. भिमाशंकर, जि. पुणे.
१५. खंडोबा मंदिर, जालना
१६. वेरुळ, जि. छ. संभाजीनगर.
१७. आंबेजोगाई, जि. बीड
१८. चांदवड-रंगमहाल, जि. नाशिक.
१९. वेल्लूर ता. सेलू, जि. परभणी.

**क. घाट**

१. चंद्रभागा घाट, पंढरपूर जि. सोलापूर.
२. चोंडी, ता. जामखेड, जि. अहिल्यानगर.
३. पैठण, जि. छ. संभाजीनगर.
४. बिंदुसरा, जि. बीड
५. गोदावरी घाट, जि. नाशिक.
६. पुणतांबा घाट, राहता, जि. अहिल्यानगर.

**ड . कुंड**

१. रावेर- केशवकुंड, जि. जळगाव.
२. घृष्णेश्वर- वेरूळ, जि. छ. संभाजीनगर.
३. हरिहरेश्वर, परळी, जि. बीड
४. त्र्यंबक. जि. नाशिक.
५. सप्तश्रृंगीगड, जि. नाशिक
६. मसवे कुंड, जि. जळगाव.

PRAKASH
NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT,
2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2025.06.05 12:00:28 +05'30'

**(प्र. नि. पाटील)**
**कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव,**
**महाराष्ट्र शासन**